**नागपूर- बुटीबोरी- वर्धा- पुलगांव- तळेगांव- कारंजा- मालेगांव- मेहेकर- सिंदखेडराजा- जालना- औरंगाबाद- वैजापूर- संवत्सर- पुणतांबेफाटा- झगडेफाटा- सिन्नर- घोटी- मुंबई मार्गाची राष्ट्रीय महामार्ग दर्जाप्रमाणे सुधारणा करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-१०९९/प्र.क्र.२२७/रस्ते-८,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २३ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :** १) शासन निर्णय क्र.खाक्षेस-१०९९/प्र.क्र.२२७/रस्ते-८, दिनांक १५ जून, २००२.

२) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाचे इंग्रजी पत्र क्र.एमएसआरडीसी/०२/सेक्रेटरी पीडब्ल्यूडी/एनएएसजीएम टीआरफ/४०९३/२०१४, दिनांक २७.१०.२०१४

**प्रस्तावना :**

सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.खाक्षेस-१०९९/प्र.क्र.२२७/रस्ते-८, दिनांक १५.०६.२००२ अन्वये नागपूर- औरंगाबाद- सिन्नर- घोटी- मुंबई रस्ता राष्ट्रीय महामार्गाचा दर्जाचा करण्यासाठी शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास 'उद्योजक' म्हणून घोषित करून हा रस्ता महामंडळाकडे हस्तांतरीत करण्यात आला होता. महामंडळाने राष्ट्रीय महामार्ग दर्जाचा दोनपदरी रस्त्याचे काम करून हा रस्ता नागपूर- मुंबई दरम्यान राष्ट्रीय महामार्ग क्र.६ व ३ यांना पर्यायी रस्ता म्हणून विकसीत केला होता. या रस्त्यावर झालेल्या खर्चाची वसूली करण्यासाठी महामंडळामार्फत एकूण ८ पथकर स्थानकावर पथकर वसूली करण्यात येत होती व यामधूनच या रस्त्याच्या दुरूस्तीचा खर्च करण्यात येत होता. शासनाच्या निर्णयानुसार दिनांक ३०.०६.२०१४ च्या मध्यरात्री पासून नागपूर- औरंगाबाद- सिन्नर- घोटी- मुंबई या रस्त्यावरील आठही पथकर स्थानके बंद करण्यात आलेली आहेत.

**शासन निर्णय :**

नागपूर- औरंगाबाद- सिन्नर- घोटी- मुंबई रस्ता व कारंजा- नागझरी हा जोडमार्ग हा सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ज्या प्रादेशिक विभागामधून जातो त्या प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांनी सदर रस्त्याचा ताबा महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या अधिकाऱ्यांकडून त्वरीत ताब्यात घ्यावा व यापुढे सदर रस्त्याची देखभाल दुरूस्ती त्यांनी करावी. तसेच या रस्त्याचा बुटीबोरी ते वर्धा हा ४२ कि.मी. लांबीचा भाग राष्ट्रीय महामार्ग क्र.३६१ म्हणून घोषित करण्यात

आलेला असल्यामुळे हा भाग राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने करावी.

सदर रस्त्याच्या हस्तातरणाच्या पूर्वीच्या सर्व बाबी म्हणजेच भू-संपादन, केलेली कामे, टोल कंत्राटदारांना देय रक्कम इ. बाबतचे उत्तरदायित्व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाचे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०२२४१६२०४५६२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sanjay Shriram Solanki

Digitally signed by Sanjay Shriram Solanki
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shriram Solanki
Date: 2015.02.25 12:41:37 +05'30'

**( सं. श्री. सोलंकी )**

**उप सचिव (खा.र.१)**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
३. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय महासंचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद/ नागपूर/ नाशिक/ अमरावती.
५. मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, शिबीर कार्यालय, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, कोकण भवन, नवी मुंबई.
७. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, अदालत रोड, बांधकाम भवन, औरंगाबाद.
८. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नागपूर.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.उप सचिव (रस्ते/ रा.म.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.